

# हा छंद जिवाला...

नंदिनी देशमुख

# हा छंद जिवाला

(ha chhand jivala)


लेखिका:- नंदिनी देशमुख

nandini.deshmukh@gmail.com

9004094617



प्रकाशक: ई-साहित्य प्रतिष्ठान

वेब: www.esahity.com

ईमेल esahity@gmail.com

प्रकाशन : २२ जानेवारी २०१५

ही एकांकिका

" माझ्यात वाचनाची, नाटकाची आणि अभिनयाची आवड निर्माण करणाऱ्या माझ्या शिक्षक वृंदाना "

आदरपुर्वक अर्पण

नंदिनी देशमुख

**एकांकिका**

# हा छंद जिवाला

**लेखिका:- नंदिनी देशमुख**

nandini.deshmukh@gmail.com

# प्रवेश पहिला

(पडदा उघडतो तेव्हा जगदीश खांद्यावर टॉवेल घेवून आतल्या खोलीतून बाहेरच्या खोलीत येतो .बाहेर पलंगावर तोंडावर पांघरून घेवून चैतन्य झोपला आहे .)

जगदीश:- (हळू आवाजात) चैतू, ए, चैतू , उठायचं नाही का अजून?

चैतन्य:- (पांघरुणातूनच ) उं … हुं …

जगदीश:- असं काय बरं करायचं ? उन्हं किती वर आली आहेत, बघितलंस का? चहा ठेवू का?

चैतन्य:- उं … हं . (पांघरुणातूनच 'हो' अशी मान हलवतो .)

जगदीश:- ए, चल , उठ ना आता . बस झाली नाटकं ….

(चैतन्य नुसतीच चुळबूळ करतो . )

जगदीश:- थांब . उठत नाहीस का? आता गंमतच करतो तुझी थोडीशी .

(ग्लासमधे पाणी घेवून येतो आणि हळूच चैतन्यच्या तोंडावरचे पांघरून बाजूला करतो . तेवढ्यात चैतन्यही पांघरून दूर करून उठायला जातो . एकदम त्याचा हात लागून पाण्याचा ग्लास हिंदकळतो आणि जगदीशच्याच अंगावर पाणी सांडते .)

जगदीश:- अरे … अरे … , ओला केलास न पायजामा ?

चैतन्य:- अं … काय? कुठे? कुणाचा पायजामा ओला झाला? तुझा?

जगदीश:- ए, एक धपाटा घालीन हं आता . सकाळी सकाळी पी . जे . नको मारूस .

चैतन्य:- काय रे , आज सुट्टीचं झोपू पण देत नाहीस यार …

जगदीश:- सुट्टी मला आहे महाशय . तुम्हाला तर काय, रोजचीच सुट्टी …

चैतन्य:- आता तू पण मला हिणवायला लागलास ना?

जगदीश:- नाही रे, तसं नाही रे चैत्या . मला एक सांग , तू इथे कशासाठी आला आहेस?

चैतन्य:- कशासाठी म्हणजे? तुला माहित आहे आमचे पिताश्री लक्ष्मणराव उर्फ भाऊसाहेब, हनुमंतराव उर्फ दादासाहेब, राजे उर्फ वडगावकर यांच्यावर रुसून आम्ही , त्यांना न सांगता आम्ही घरातून पळून इथे आलो आहोत .

जगदीश:- ते आम्हाला माहित आहे, चैतन्य उर्फ नानू उर्फ नानासाहेब, राजे उर्फ वडगावकर .

चैतन्य:- ए, मला ते काही उर्फ बिर्फ नको म्हणूस हं ... मला आपलं फक्त चैतन्य राजे म्हण. तुझ्यासाठी तर मी चैतू, चैत्या आहे ... कळलं ?

जगदीश:- कळलं ... गंमत केली थोडी . असा कसा रे तू ....

चैतन्य:- येडचाप .

जगदीश:- बरं , चैतन्य राजे , तुम्ही तुमच्या पिताश्रींवर रागवून इथे आलात हे आम्हाला माहित आहे . पण इथे असे आमच्या रूमवर हातावर हात मारून तुम्ही किती दिवस बसणार आहात?

चैतन्य:- काय रे जग्या ... दोनच दिवस झाले मला इथे येवून आणि आता तुला पण मी जड झालोय का ?

जगदीश:- हो ... तसा जाड आहेस आणि म्हणूनच जडही झाला आहेस . पण राजे साहेब असे नुसते बसून कसे चालेल? काहीतरी हातपाय तर हलवायलाच हवेत ना ? शिवाय पुढच्या महिन्यात हे घर रिकामे करावे लागणार आहे . पुढच्या महिन्यात माझे लग्न झाले की मी नवीन जागेत राहायला जाणार आहे . त्यावेळी तर तुझी तुला काहीतरी सोय बघावीच लागणार आहे ना?

चैतन्य:- अरे, नोकरी करावीच वाटत नाही रे यार आणि तुझ्यासारखी एखाद्या स्टेट गव्हर्नमेंटच्या ऑफीसमध्ये तर मुळीच नाही . तुला माहित आहे ना नाटक हे माझं passion आहे . मला त्याच्याशिवाय दुसरे काही सुचतच नाही . मला रंगभूमीचे आकर्षण आहे , मोठा नट व्हायचे आहे . 'घर देता का कुणी घर?' असे मला नाटकात म्हणायचे आहे , रिअल लाइफ़ मधे नाही ...

जगदीश:- हो. रंगभूमी हे तुझे स्वप्न आहे , ते तुझे ध्येय आहे, हे मला माहित आहे पण एकदम कसे तुला त्याच्यात शिरता येईल? त्यासाठी योग्य संधी तर मिळायला हवी की नाही? आणि तोपर्यंत पोटापाण्याची काहीतरी सोय पण करायला हवी . मी किती दिवस तुला मदत करणार?

चैतन्य:- ते कळतंय रे मला . हे बघ म्हणूनच तर काल ही एवढी वर्तमानपत्रे घेवून आलोय.

जगदीश:- मी दिलेल्या पैशातूनच आणली असशील .

चैतन्य:- हो आणली तुझ्या पैशाने ... ठेव लिहून सगळा हिशोब . तुझी पै न पै फेडून टाकीन. पण एक लक्षात ठेव , मी मोठा नट झालो , आणि माझी नाटकं खूप गाजायला लागली ना की ती बघायला येण्यासाठी माझ्याकडे पास मागायला मात्र येवू नकोस .आणि त्यावेळी तुला एक नाही , चांगले चार, पाच पास लागतील . तुझे सगळे लटाम्बळ घेवून येशील ना ...

जगदीश:- अरे , अरे , चिडू नकोस रे चैत्या , सकाळी सकाळी . अजून चहा पण घेतला नाहीस. जा . तू ब्रश करून फ्रेश हो तोपर्यंत ...

चैतन्य:- चहा करतोस ना ?

जगदीश:- या जाहिराती बघतो. काय , कुठे, कशी नोकरी आहे ते तरी बघू दे ....

चैतन्य:- एक तरी नोकरी माझ्या लायकीची असेल तर शपथ .

जगदीश:- कशी पाहिजे तुला नोकरी? एखाद्या नाटक कंपनीत पडदे ओढायची चालेल?

चैतन्य:- जग्या ... (ओरडून त्याच्या अंगावर धावून जातो .)

जगदीश:- अरे असे पडदे ओढून किंवा झाडू पोछा करूनच पुढे नाटकात काम करायचा चान्स मिळतो राजेसाहेब . आणि आपल्या करिअर साठी माणसाने काहीही करायची तयारी ठेवली पाहिजे एवढे मला माहित आहे .

चैतन्य:- हो ... पण मी तसले काहीही करणार नाही . बघशीलच .

जगदीश:- हं ... बघू ... पण आता सध्या या जाहिराती तर बघू . एक काम कर , जा.

तोंड धू आणि आपल्या दोघांसाठी मस्त चहा करून आण . जा ….

(त्याला आत ढकलतो . चैतन्य चहा करण्यासाठी आत गेला आहे आणि जगदीश पेपरमधील जाहिराती मोठमोठ्याने वाचतो . )

Reqd. by a Ltd. Co. for their Pune Branch: ACCOUNTANT- 2 Posts, 2-3 yrs exp. with Tally; उं ssssssss , हे नको.

Mechanical Draftsman …. नाही जमणार .

BAMS ,BHMS Health Care साठी … ते तर शक्यच नाही .

भारतातील अग्रगण्य फायनान्स कंपनीसाठी सेल्स एक्झिक्युटीव्ह पाहिजे .

फायनान्स … ? अं … विचार करावा लागेल .

चायला, खरच की चैत्या म्हणला तसंच एकही जॉब चांगला दिसत नाही .

(तेवढ्यात चैतन्य चहाचे दोन कप घेवून येतो)

चैतन्य:- काय झालं ? सापडली जाहिरात?

जगदीश:- नाही रे . बरं ते जावू दे . मला सांग तुझी रास कोणती?

चैतन्य:- आता काय भविष्य बघणार आहेस?

जगदीश:- अरे, सांग तर खरं …

चैतन्य:- वृश्चिक .

जगदीश:- वाटलंच मला .

चैतन्य:- काय?

जगदीश:- काही नाही … हे बघ, तुझ्या राशीत लिहिलंय, ‘संधी चालून येईल’.

चैतन्य:- कशाची संधी? माझा बिलकुल विश्वास नाही या भविष्यावर . काही पण मनाला येईल ते ठोकून देतात . दोन चार ठराविक वाक्ये असतात . तीच आलटून पालटून प्रत्येक राशीत घालतात . ‘मित्रांच्या भेटी होतील,’ ‘प्रवास होईल’ किंवा ‘दूरचा प्रवास टाळा’, ‘लॉटरी लागेल’ ‘खर्च होईल’ . ‘घरात शुभ कार्य होईल .’ मला एक सांग , एकूण राशी किती आहेत ?

जगदीश:- बारा .

चैतन्य:- आणि आपली लोकसंख्या किती आहे? आं ... कर ना हिशोब . अमुक अमुक कोटी भागिले बारा ...

जगदीश:- अमुक अमुक काय म्हणतोस? नक्की आकडा माहित नाही का?

चैतन्य:- माहित आहे रे . पण मी इथे तुला हे कॅलक्युलेशन सांगेपर्यंत त्याच्यात आणखी किती भर पडेल ते नाही सांगता येणार . तर मूळ मुद्दा असा, अमुक अमुक कोटी भागिले बारा केल्यानंतर जी काय संख्या येईल त्यांच्या सगळयांच्या आयुष्यात काय सारख्या घटना घडणार आहेत का?

जगदीश:- बरं बाबा, चिडू नकोस एवढा . बघ आणखी एखादी कुठे तरी कोपऱ्यात असेल आपल्या कामाची जाहिरात तर ...

चैतन्य:- तूच बघ .

जगदीश:- (पुन्हा पेपर चाळतो ) अं ... सेल्स गर्ल पाहिजे .

चैतन्य:- सेल्स गर्ल पाहिजे, सेल्स बॉय नाही .

जगदीश:- मग काय झालं ? आपण बॉयला गर्ल करायचं ! ए, ए, चैत्या ... एक आयडिया . धमाल ... तू जा सेल्स गर्ल बनून इंटरव्ह्यू द्यायला .

चैतन्य:- काहीतरीच काय बोलतोस? शुद्धीवर आहेस ना?

जगदीश:- पूर्णपणे शुद्धीवर राहून बोलतोय . ए, साल्या, काय धमाल करायचास रे कॉलेज मधे नाटकात काम करताना. आणि आता का माघार घेतोस?

चैतन्य:- ती गोष्टच वेगळी होती रे . ते दिवस पण वेगळे होते .

जगदीश:- कॉलेजमध्ये नाटकात तू मुलींची कामे करायचास . काय आयटम दिसत होतास रे राजा . मुली पण लट्टू होत्या तुझ्या त्या स्त्री पार्टवर ...

चैतन्य:- जावू दे रे त्या आठवणी .

जगदीश:- आणि एकदा तर साडी नेसून ....

चैतन्य:- ए, नको काढू ना त्या आठवणी . तेव्हाची गोष्ट वेगळी होती . आता ...

जगदीश:- आता काय झालय? सहज आपली गंमत म्हणून . आणि कुणाला काय कळणार आहे?

चैतन्य:- आधीच तर आमचे पिताश्री

जगदीश:- लक्ष्मणराव उर्फ भाऊसाहेब

चैतन्य:- हनुमंतराव उर्फ दादासाहेब

जगदीश:- राजे उर्फ वडगावकर

चैतन्य:- आमच्यावर चिडलेले आहेत आणि पुन्हा हे असले काही केले तर आमची काही खैर नाही .

जगदीश:- पण नानू उर्फ नानासाहेब , राजे उर्फ वडगावकर आमचे म्हणणे असे आहे की तुमच्या पिताश्रीना हे कळेलच कसे?

चैतन्य:- चला राव , बस झाली आता मस्करी . मस्करीची कुस्करी नको व्हायला .

जगदीश:- काही होत नाही . मी खरंच सांगतो . ए, निदान मला तरी बघू दे ना एकदा तुझं ते गोंडस रुपडं . का घाबरलास? आं ...

चैतन्य:- मी आणि तुला घाबरतो? ह्यां ... काहीतरीच बोलू नकोस . ते कसे शक्य आहे पण?

जगदीश:- मनात आणले की सगळे शक्य होते . हं ... पण आता तूच नाही म्हणत असशील तर ... सांग ना सरळ सरळ नाही जमणार म्हणून .

चैतन्य:- अरे पण ...

जगदीश:- पळ ... पळ शेपूट घालून . पैज लावतो मी . तू जर मुलीचा ड्रेस घालून दाखवला तर मी तुला मस्तपैकी पार्टी देईन . तू जिथे म्हणशील तिथे , जे म्हणशील ते . हं , पण नाही तर तुला मला पार्टी द्यावी लागेल .

चैतन्य:- कसंतरीच वाटतंय रे . भीती वाटते .

जगदीश:- भीती आणि तुला? त्यातच तर थ्रिल आहे . तुला नाटकाची आवड आहे ना? मग नाटकातला एखादा सीन समजून कर . ते इंटरव्ह्यू वगैरे सोड . उगाच आपलं इथच रूमवर ...

चैतन्य:- एवढे सोपे आहे का ते? कपडे, मेक अप .

जगदीश:- ते सगळं तू माझ्यावर सोड . परवाच मी रेवतीला गिफ्ट देण्यासाठी दोन

तीन ड्रेस आणि मेक अप बॉक्स आणलाय . अजून मी तिला सांगितले नाही सरप्राईज देणार आहे . तू ट्राय कर . बाकी काही लागले तर आणून घेवू .

चैतन्य:- आणि पैशांचे काय? आत्ता थोड्या वेळापूर्वीच तर ओरडत होतास ना?

जगदीश:- वो छोड दे यार . दोस्त के खातीर जान देनेको तैयार है , फिर पैसे का क्या ? तुला नोकरी लागल्यावर वापस कर . हं ... लेकिन आज धमाल करेंगे . चल , मी तुला ड्रेस दाखवतो .

चैतन्य:- चल तर मग . होवूनच जावू दे तुझ्या मनासारखं .

(दोघेही हातात हात घालून नाचत नाचत आत जातात .)

(प्रवेश पहिला समाप्त)

# प्रवेश दुसरा

(तीच रूम . पलंगावरचे पांघरूण , पेपर , चहाचे कप सगळा पसारा तसाच पडला आहे . समोर कुणीच नाही . बेल वाजते .)

जगदीश:- (आतूनच) कोण आहे ?

(बेल सारखी वाजत रहाते )

जगदीश:- आलो , आलो . आता कोण आलय? (बाहेर येतो)

चैतन्य:- (आतूनच ओरडतो) कुणीही आलेलं असू दे , त्याला बाहेरच्या बाहेर कटव .

जगदीश:- आलोच .... (दार उघडतो)

(दारात एक वयस्कर गृहस्थ उभे आहेत . हातात पिशवी . )

जगदीश:- भाऊसाहेब ...? तुम्ही?

भाऊसाहेब:- हो . आम्हीच . लक्ष्मणराव उर्फ भाऊसाहेब .

जगदीश:- हनुमंतराव उर्फ दादासाहेब आणि राजे उर्फ वडगावकर .

भाऊसाहेब:- अरे वा ... तुम्हाला चांगलंच पाठ झालय की आमचे नाव . आमच्या चिरंजीवानी पढवले असेल . बाकी तशी नक्कल करण्यात बिलंदर आहे तो .

जगदीश:- हो, म्हणजे नाही ... म्हणजे हो ... अं ... नाही ...

भाऊसाहेब:- हो ... हो ... नाही ... नाही ... काय करतोस? कुठे , आहेत कुठे आमचे चिरंजीव ?

जगदीश:- कोण? चैतन्य? नाही . इथे नाही आला तो .

भाऊसाहेब:- जावून जावून कुठे जाणार तो? मला माहित आहे, तूच त्याचा जिगरी दोस्त आहेस. बापाला न सांगता घरातून पळून आला म्हणजे काय फार शहाणपणा झाला का? दोन दिवस वाट बघितली . म्हटलं, जावून जावून कुठे जाणार? पण बाईसाहेबांच्या डोळ्याचे पाणी काही थांबेना . म्हणून आलो आज इथे. मला खात्री आहे, तुझ्याशिवाय दुसरीकडे कुठे जाणार नाही तो.

जगदीश:- अहो, खरच सांगतो भाऊसाहेब, इथे नाही आला तो .

भाऊसाहेब:- असं म्हणतोस? बरं राहिलं. गेला असेल कुठेतरी . पण मला घरात तरी येवू देतोस का नाही? काही बसा- गीसा, पाणी बिनी ...?

जगदीश:- हं ... हो हो या ना . बसा . पाणी आणतो .

(पाणी आणायला आत जातो. भाऊसाहेब खोलीचे निरीक्षण करतात. जगदीश पाण्याचा ग्लास त्यांच्या हातात देतो . तेवढ्यात आतून काहीतरी पडल्याचा आवाज येतो.)

भाऊसाहेब:- काय रे? कुणी आहे का आत?

जगदीश:- नाही, कुणी नाही .

भाऊसाहेब:- काहीतरी पडल्याचा आवाज आला .

जगदीश:- बोका असेल . तो शेजारचा .खूप त्रास देतो .

भाऊसाहेब:- मला वाटलं, आमचे चिरंजीव आत लपून बसलेत की काय?

जगदीश:- नाही हो. खरच नाही .

भाऊसाहेब:- कुठे शोधावे आता या पोराला ! नातेवाईकांच्या कुणाच्या घरी तो जाणार नाही. माहित आहे मला. या नाटकाच्या नादाने कामातून गेलाय पोरगा. हे बघ जगू,

जगदीश:- काय? काय म्हणालात? (त्याची चुळबूळ चालू आहे. )

भाऊसाहेब:- तू थोडे समजावून सांग त्याला. म्हणावं, आपल्यासारख्यांच्या घरात हे असे नाटक बिटक बरे नाही. तू त्याचा जवळचा मित्र आहेस, तुझे ऐकेल तो, म्हणावं, असे नाटकात काम करून पोट भरत नाही. आमच्या घरात हे असले काही चालत नाही. मला एक कळत नाही या पोराच्या डोक्यात हे नाटकाचे खूळ आले कुठून? पण हां, एक गोष्ट मात्र लक्षात आली बरे का, आमच्या मंडळीला आहे थोडी आवड या अशा गोष्टींची . दुपारच्या वेळेला चार बायका जमल्या की यांच्या नकला सुरु होतात . अशा हुबेहूब नकला करतात की विचारू नका . त्यांच्या कडूनच हे पोराकडे आले असणार .

जगदीश:- हं ... हो .

भाऊसाहेब:- हं …हं काय करतोस? काय करू, कुठे शोधू ते सांग की .

जगदीश:- मी … मी काय सांगू? मला खरेच माहित नाही तो कुठे आहे ते .

भाऊसाहेब:- बरं , चला जातो आणखी एक दोन ठिकाणी . फोन गिन करतो .
(जातात )

जगदीश:- चैत्या , ए चैत्या , ये बाहेर , गेले रे ते…. !

चैतन्य:- (हातात चहाचा ट्रे घेवून ठुमकत ठुमकत मुलीच्या वेशात बाहेर येतो . जगूच्या हातात एक कप देतो आणि लाजतो) इश्श्य ssss .

जगदीश:- हाय … मार डाला … (हातातला कप बाजूला ठेवतो आणि त्याला मिठी मारतो) डार्लिंग … कित्ती गोड दिसतेस . माय स्वीट हार्ट …
(तेवढ्यात दर उघडून भाऊसाहेब आत येतात .)

भाऊसाहेब:- अरे, माझा चष्मा राहिला रे …
(जगदीशला आणि त्या मुलीला तशा अवस्थेत बघून दचकतात )
आं …. शी ssss शी ssss , काय हे? जगू, जग्या , काय चाललय हे? अरे मी तुला किती सभ्य समजत होतो आणि तू? हे असले चाळे करतोस? तरीच मघाशी आत काहीतरी पडल्याचा आवाज आला, हीच मुलगी आत होती वाटते, आणि तू खोटे बोललास . आतमध्ये कुणीही नाही म्हणालास . अरे अरे, तो तसा तर हा असा … !

जगदीश:- कुणी नाही म्हणजे चैतन्य आतमध्ये नाही असे म्हणालो मी .

भाऊसाहेब:- कोण? आहे तरी कोण ही मुलगी? तू एकटा असताना राजरोस तुझ्या घरी येते? तू एवढा नालायक असशील असे वाटले नव्हते . थांब, तुझ्या वडिलांनाच जावून सांगतो सगळे .

चैतन्य:- (लाजतो) इश्य sss (जगूच्या कानात काहीतरी सांगतो)

जगदीश:- नाही, तसं काही नाही भाऊसाहेब , तुमचा काहीतरी गैरसमज झालाय . ही, ही माझी होणारी बायको , तुमची सून .
(चैतन्य त्यांना नमस्कार करतो)

भाऊसाहेब:- काय म्हणालास? तुझी होणारी बायको? आमची सून? आं , अरे हे आधी नाही का सांगायचे मग?

जगदीश:- आधी? मग? सांगितले ना मग . मला वाटले तुम्हाला आवडणार नाही, हे असे . मला भीती वाटली .

भाऊसाहेब:- हं … आवडत नाही, ते बरोबर आहे . पण आता आजकाल तुम्हा मुलांचे हे असे चालते सगळे लग्नाच्या आधी, सगळे तसेच . मग काय बोलणार? पण ही एवढ्या सकाळी सकाळी कशाला आली इथे?

चैतन्य:- आज सुट्टी आहे ना ह्याला . आम्हाला थोडी खरेदी करायची होती लग्नाची, म्हणून आले . आत्ताच आले, तुम्ही येण्याच्या थोडे दहा पंधरा मिनिट आधी .

भाऊसाहेब:- छान , छान . अजून लग्न होवून घरात पाऊलही टाकले नाही तर चांगला खिसा कापतेस त्याचा . बरं , छान छान . मुली, नाव काय तुझं ?

चैतन्य:- चैताली .

भाऊसाहेब:- नाव विचारले की पूर्ण नाव सांगावे .

चैतन्य:- चैताली …. चैताली उकडगावकर .

भाऊसाहेब:- छान. चैताली , जा चहा करून आण चांगला . चला , आज नवीन सूनबाईच्या

हातचा चहा प्यायला मिळणार . काय रे जगू? केव्हा आहे लग्न?

जगदीश:- लग्न? हं … पुढच्या महिन्यात .

(भाऊसाहेब घरात एक चौफेर नजर टाकतात.)

आणि लग्न झाल्यावर नवीन जागेत रहायला पण जाणार . ही जागा सोडणार आहे .

(चैतन्य आधीच्या राहिलेला चहा तसाच उचलून आत नेतो )

चैतन्य:- (मनाशीच) आता हेच गरम करून आणतो …

भाऊसाहेब:- अहो, जगदीशराव , असा आत्तापासूनच चेहरा पडून काय बसलात? खर्चाची

काळजी पडली का? आता हे असंच चालायचं . तुम्ही ‘पुरे का’, ‘पुरे का?’ असे  विचारणार आणि त्या ‘आणा’, ‘अजून आणा’ म्हणणार .

(चैतन्य आतून चहा गरम करून आणतो . दोनऐवजी तीन कप आणतो आणि सगळयांना देतो . स्वतः पण तिथेच बसतो . भाऊसाहेब त्याच्याकडे बघतात . (त्यांच्या चेहऱ्यावर नाराजी आहे.)

भाऊसाहेब:- वा … छान झालाय चहा . अगदी आमचा चैत्या करतो तसाच झालाय . कडक एकदम . चहापावडर जास्त आणि दूधही जास्त . मस्त .

जगदीश:- हो . जास्त न घालायला काय झालं ? फुकटात मिळतंय सगळं .

भाऊसाहेब:- फुकट? म्हणजे?

चैतन्य:- म्हणजे त्याला असे म्हणायचे असेल ….  की तुमच्या घरी दूधदुभते आहे का? आणि हा चैत्या कोण? तुमचा मुलगा का?

भाऊसाहेब:- चैत्या ssss (ती मुलगी चैत्या म्हणते हे त्यांना आवडत नाही)? माझा मुलगा . तो आणि जगू लहानपणापासूनचे मित्र. जीवलग दोस्त .

जगदीश:- बरं  . चल . आपण निघायचं का खरेदीला?

चैतन्य:- हो चालेल . चल . आणि जेवण बाहेरच करू . एखाद्या छानशा हॉटेल मध्ये जावू.

जगदीश:- हॉटेलमध्ये? जेवण?

भाऊसाहेब:- बरं , मी काय म्हणतो पोरानो , आता मला बाहेर जायचा कंटाळा आलाय . मी इथेच आराम करतो .

जगदीश:- काकू वाट बघत असतील ना पण घरी.

भाऊसाहेब:- नाही . मी सांगितले आहे  तिला वाट बघायची नाही म्हणून . आणि काळजी तर मुळीच करायची नाही .

चैतन्य:- पण तुमचे जेवण?

भाऊसाहेब:- तुम्ही बाहेर जेवून येताय ना. मग माझ्यासाठी पण घेवून या काहीतरी . डोसा आण. ते तुमचं पार्सल का फिर्सल म्हणता ना तुम्ही ते...

जगदीश:- आम्हाला उशीर होईल भाऊसाहेब .

भाऊसाहेब:- अरे हो, सूनबाईला तिच्या घरी नेवून सोडायचे असेल ना?

चैतन्य:- नाही . खरेदी करून सरळ इथेच येणार आम्ही .

जगदीश:- बरं चल , मी आलोच आत्ता तयार होवून . (आत जातो)

चैतन्य:- तुमचा मुलगा कुठे असतो? कुठे नोकरी बिकरीला वगैरे आहे का?

भाऊसाहेब:- तो ? आणि नोकरी? एवढे कुठे आमचे नशीब? कुठे गेलाय काय माहित? त्यालाच बघायला तर आलो मी इथे. वाटले जग्याला माहित असेल . पण कय. तो तसा तर हा असा .

चैतन्य:- पण घरातून निघून जाण्यासारखे काय झाले ? नाही म्हणजे मी आपलं सहज …

भाऊसाहेब:- त्याचे ना, डोके ठिकाणावर नाही त्याचे . थोडा चक्रम आहे .

चैतन्य:- म्हणजे?

भाऊसाहेब:- म्हणजे नादिष्ट आहे थोडा . नाटकात जायचे म्हणतोय . पण दिसायला तर असा देखणा आहे म्हणून सांगू? राजबिंडा, आईच्या वळणावर गेलाय .

चैतन्य:- नाटकात जायचे आहे ? छान आहे की !

भाऊसाहेब:- काय छान आहे डोंबले . आणि खायचे काय मग पोटाला?

(तेवढ्यात जगदीश आतून तयार होवून येतो .)

जगदीश:- काय झाले ? कुणाला काय खायचे पोटाला?

चैतन्य:- काही नाही, हेच काका सांगत होते, त्यांचा मुलगा …

जगदीश:- चल . चल . पटकन . बोलत बसायला वेळ नाही आपल्याला .

चैतन्य:- येतो काका आम्ही .

भाऊसाहेब:- हो, येताना डोसा तेवढा मात्र आणायला विसरू नका .

( ते दोघे जायला निघणार तेवढ्यात एक गृहस्थ येतात .)

गृहस्थ:- जगदीश टेकाळे इथेच राहतात ना?

जगदीश:- हो, मीच जगदीश टेकाळे .

गृहस्थ:- नमस्कार . पुढच्या महिन्यात हे घर खाली होणार असे समजले . मला जागा हवी होती . म्हटलं आज सुट्टीचे तुम्ही घरीच असाल, म्हणून बघायला आलो .

जगदीश:- नाही, नाही अजून काही नक्की नाही .

भाऊसाहेब:- नाही कसे ? आत्ताच म्हणालास ना , पुढच्या महिन्यात लग्न झाले की नवीन घरात राहायला जाणार म्हणून .

गृहस्थ:- ओह! लग्न ठरलंय का? अभिनंदन .

भाऊसाहेब:- हो . आणि ही त्याची मिसेस . आमची सूनबाई .

चैतन्य:- नमस्ते .

जगदीश:- हे बघा, मी नाही घर सोडणार आत्ताच . तुमचा काहीतरी गैरसमज झालाय . दुसऱ्या कुणाचा तरी पत्ता हवा असेल तुम्हाला . आणि मी आता सध्या तरी काही बोलण्याच्या मन:स्थितीत नाही .

गृहस्थ:- ठीक आहे, हे माझे कार्ड . फोन करा मला . ठीक आहे . येतो .

(ते गृहस्थ जातात . भाऊसाहेब तिथेच पलंगावर आडवे होतात . ते गृहस्थ गेले का ते बघण्यासाठी जगदीश मनाशीच बडबडत बाहेर जातो )

जगदीश:- या माणसाला पण आजच इथे यायचे काही काम होते का?

(जगदीश घाबरून ओरडतच आत येतो . आणि चैतन्यला म्हणतो)

जगदीश:- बाप रे.... ! ती आली .

चैतन्य:- कोण आली?

(भाऊसाहेब डोळे लावून पडलेले आहेत, त्यांची दोघांची कुजबुज चालू आहे)

जगदीश:- ती रे... रेवती. आज आमचे बाहेर खरेदीला जायचे ठरले होते ना .

चैतन्य:- मग आता?

जगदीश:- तू लप आत जा . मी बघतो काय करायचे ते .

(भाऊसाहेबांकडे बघतो, ते घोरत आहेत. चैतन्य आत जातो आणि जगदीश बाहेर जायला लागतो, पण त्याला ढकलून रेवती आत येते .)

रेवती:- अरे, काय बाहेरच्या बाहेर कटवायचा विचार आहे का काय? घरात तरी येवू देशील की नाही?

जगदीश:- नाही . तसं काही नाही गं . ये ना … पण … (भाऊसाहेबांकडे बघतो)

रेवती:- हे कोण?

जगदीश:- माझ्या एका मित्राचे वडील . चैतन्यचे .

रेवती:- हं … तू मागे एकदा काहीतरी बोलला होतास त्याच्याबद्दल . नाटकात काम करायचं वगैरे … असंच ….

जगदीश:- हो . तोच . हळू बोल . त्यांची झोपमोड होईल . अगं , मी तुला यासाठी आत येवू नको म्हणत होतो, या पूर्वीच्या लोकांना आवडत नाही गं , हे असे काही .

रेवती:- असे म्हणजे कसे ?

जगदीश:- हे असे , रूमवर आलेले वगैरे .

(भाऊसाहेब कूस बदलतात)

रेवती:- तसं काही नाही, आजकाल सगळ्यांना माहित आहे . बरं , मला पाणी तरी देशील का नाही? का मी घेवू आत जावून?

(आत जायला लागते)

जगदीश:- अगं , थांब, थांब . बस . बस ना , मी देतो ना आणून पाणी . चहा हवाय का? करू का ? पण दूध आहे की नाही माहित नाही . बघावे लागेल . नाहीतर असे करू, चल आपण बाहेरच जावू, पाणी, चहा सगळंच करू बाहेर .

रेवती:- बाहेर नको रे! आत्ताच तर आले मी . बस ना थोडावेळ . गप्पा मारू . नंतर जावू की बाहेर .

जगदीश:- बरं बस . पाणी आणतो .

(जगदीश पाणी आणायला आत जातो, रेवती त्याच्या मागे जाते . आणि किंचाळतच बाहेर येते . तिच्या ओरडण्याने भाऊसाहेब घाबरून उठतात .)

भाऊसाहेब:- काय झाले ? कोण ओरडले ?

(रेवतीकडे बघतात .)

भाऊसाहेब:- आं … कोण तुम्ही?

रेवती:- (जगदीशला हाक मारते) जगदीश, जगदीश ssss .

भाऊसाहेब:- (ते पण ओरडतात) जगदीश …।

(जगदीश तसाच अंग चोरून एका कोपऱ्यात उभा आहे .)

भाऊसाहेब:- जगदीश , कोण आहे ही मुलगी ?

रेवती:- मी … मी रेवती . जगदीशची भावी पत्नी .

(नमस्कार करते)

रेवती:- ओह! आत तुमची मुलगी आहे वाटते . मी घाबरलेच एकदम .

भाऊसाहेब:- रेवती? तू? जगदीशची होणारी बायको?

रेवती:- हो .

भाऊसाहेब:- नक्की?

रेवती:- हो अहो नक्की . आज आम्ही लग्नाची थोडी खरेदी करायला जाणार होतो म्हणून त्यानेच बोलावले मला . पण तुमची मुलगी आत काय करतेय?

भाऊसाहेब:- मुलगी? माझी मुलगी? मला नाही कुणी मुलगी-बिलगी . मी नाही ओळखत कुणाला .

जगदीश:- हो, अगं रेवती, तू त्यांना मुलीसारखीच आहेस ना !

(रेवतीकडे पाहून तिला खुणेने सांगतो की त्यांच्या डोक्याचा स्क्रू ढिला आहे आणि हळूच तिला म्हणतो)

जगदीश:- बघ, ते आपल्या मुलीला पण ओळख देत नाहीत .

भाऊसाहेब:- जगदीश ….

जगदीश:- ओ …

भाऊसाहेब:- असा इकडे ये, इथे माझ्यासमोर .

(जगदीश त्यांच्यासमोर जावून उभा राहतो)

भाऊसाहेब:- ही तुझी होणारी बायको आहे?

जगदीश:- हो .

भाऊसाहेब:- रेवती?

जगदीश:- हो .

भाऊसाहेब:- आज तुम्ही लग्नाच्या खरेदीला जाणार आहात?

जगदीश:- हो .

भाऊसाहेब:- हो हो काय करतोस? नंदीबैलासारखा . अजून लग्न व्हायचंय .

जगदीश:- हो . मघाशी मी तुम्हाला सांगितले होते की ....

भाऊसाहेब:- काय सांगितले होतेस ?

जगदीश:- हेच की आम्ही खरेदीला जाणार आहोत म्हणून .

भाऊसाहेब:- हो पण तू हिच्यासोबत जाणार असे नव्हते सांगितलेस . आं , अरे ती कोण मग?

जगदीश:- ती ? ती म्हणजे कोण?

भाऊसाहेब:- अरे ती मघाशी इथे नव्हती का ती? ... ती?

जगदीश:- हं ... हं ... ती होय? आत्ताच रेवती म्हणाली ना की ती तुमची मुलगी आहे म्हणून.

भाऊसाहेब:- रेवती म्हणाली की ती माझी मुलगी आहे?

जगदीश:- हो .

भाऊसाहेब:- अरे हो ... हो . खरच . रेवती मला मुलीसारखीच आहे . असं तू म्हणालास ना?

रेवती:- थांबा . काहीतरी फालतू बोलत बसू नका . मीच बघते ती आत काय करतेय ते .

(रेवती आत जाते . आणि चैतन्यच्या हाताला धरून बाहेर आणते)

रेवती:- ही मुलगी म्हणाले मी . भाऊसाहेब ही तुमची मुलगी आहे ना?

जगदीश:- अगं , मुलासारखाच त्यांचा तिच्यावरही राग आहे . ते बोलत नाहीत तिच्याशी .

भाऊसाहेब:- जग्या, काय रे , आमच्या चैत्यासारखा तू पण वाहवत चाललास की काय? तो तसा अन तू असा . ही ती चैताली ना, मघाशी तुझ्याबरोबर होती ना? गुलुगुलु बोलत होतात दोघेही .

रेवती:- जगदीश ... कोण आहे ही चैताली ? (रडायला लागते)

चैतन्य:- वहिनी , रडू नका, रडू नका प्लीज . मी सांगते तुम्हाला सगळे .

रेवती:- सगळे ? म्हणजे? जगदीश, ही तुझी गर्ल फ्रेंड आहे का? आणि तुम्ही दोघे...? जगदीश, मला हे सगळे आधी सांगायचे असते . मी तुझ्याशी लग्न करायला नकार दिला असता . आता मी माझ्या आईबाबांना काय सांगू?(रडायला लागते)

जगदीश:- रेवती, रेवा, अगं माझं ऐकून तर घे एकदा . अगं ती माझी गर्ल फ्रेंड नाही ...

रेवती:- मग कोण आहे?

जगदीश:- ती सेल्स गर्ल ....

रेवती:- सेल्स गर्ल? आणि आत काय करतेय? ती तुझ्याशी गुलुगुलु गोष्टी करते का?

भाऊसाहेब:- शिव शिव ... काय म्हणावे तुम्हा मुलांना काही कळत नाही . एवढे शिकला सवरलात आणि असे नाव काढता आईबापाचे ? चांगले पांग फेडता आहात . आमचे चिरंजीव तसे आणि तुम्ही हे असे दिवे लावताय . हे प्रकरण तर अगदीच हाताबाहेर गेलेले दिसतेय .

रेवती:- जगदीश, आपले लग्न मोडले असे समज . चालले मी . तुला काय वाटेल ते कर . लग्न कर हिच्याशी . सुखाने संसार करा ... मी चालले ...

जगदीश:- रेवती , ऐकून तर घे ...

चैतन्य:- वहिनी, प्लीज .

रेवती:- तू तर बोलूच नकोस ग ... आता मला कुणी अडवू शकत नाही .बरे झाले मी स्वतःच्या डोळ्यांनी बघितले .

(जायला निघते . दार उघडते, तेवढ्यात ते मघाचे गृहस्थ पुन्हा आत येतात .)

रेवती:- आता तुम्ही कोण आणखी?

गृहस्थ:- तुम्ही कोण पण? मघाशी मी आलो होतो तेव्हा तुम्ही नव्हता .

जगदीश:- ती माझी होणारी ....

रेवती:- कुणीही नाही मी तुमची . कशाला माझी पत्नी म्हणून ओळख करून देता?

गृहस्थ:- एक मिनिट . एक मिनिट . मघाशी तुमची पत्नी म्हणून मला ह्यांनी (भाऊसाहेबांकडे बोट दाखवून) ह्यांची (चैतन्याकडे बघून) ओळख करून दिली होती .

रेवती:- बघा ... बघा . एकदा बायको म्हणतात, एकदा सेल्स गर्ल , एकदा गर्लफ्रेंड .

चैतन्य:- गर्ल फ्रेंड तो नाही म्हणाला , तुम्हीच म्हणालात .

रेवती:- तू गप्प बस . एक अक्षर बोलू नकोस .

गृहस्थ:- बाप रे, भलतेच काहीतरी वेगळेच प्रकरण दिसते आहे .

चैतन्य:- आमच्या घरगुती भानगडीत तुम्ही कशाला पडताय ? काय काम आहे तुमचे इथे? कामाचे बोला आणि चालायला लागा . आम्ही आमचे काय ते बघून घेवू .

गृहस्थ:- हो, तेही बरोबर आहे म्हणा . तुमच्या घरगुती भानगडीत मी कशाला पडू ? ठीक आहे . मी माझ्या कामाचे बोलतो . मी इथे या जागेसाठी आलोय . मी एक नवीन नाटक बसवतोय .

चैतन्य:- नवीन नाटक?

गृहस्थ:- हो . त्याच्या रिहर्सल्ससाठी मला जागा हवी आहे . स्वतंत्र . ही जागा छान आहे, मध्यवर्ती आणि सगळयांच्या सोयीची .

चैतन्य:- कोणते नाटक बसवताय?

गृहस्थ:- अरे हो . मी माझी ओळख करून देतो . मी मकरंद चिटणीस .

चैतन्य:- मकरंद चिटणीस? म्हणजे ते प्रसिध्द नाट्य दिग्दर्शक , मकरंद चिटणीस?

जगदीश:- ओह गॉड ! त्यांनी मघाशी कार्ड दिले होते पण मी बघितलेच नाही .

मकरंद:- हो मीच तो .

चैतन्य:- मी ओळखतो , आपलं ओळखते तुम्हाला . मला तुमची नाटकं खूप आवडतात .

मकरंद:- बरे झाले , तुम्ही मला ओळखलेत . तर माझ्या नाटकाच्या रिहर्सल्स साठी मी ही जागा बघायला आलोय .

जगदीश:- अरे वा . छान . बरं झालं . तुमची ओळख झाली .

भाऊसाहेब:- हं .... (त्याच्याकडे वेगळ्याच अर्थाने बघतात .) आणि या घरात ही नाटकं चालू आहेत . हे नाटक काही माझा पिच्छा सोडायला तयार नाही .

चैतन्य:- ओह ... कित्ती छान . तुम्ही कोणते नाटक बसवताय ?

मकरंद:- एक नवीन नाटक आहे . कास्टिंग झालंय . फक्त अजून एका पात्राच्या शोधात आहे . स्त्रीपात्र करण्यासाठी एखादा मुलगा शोधतोय .

(चैतन्य एकदम जगदीशला मिठी मारतो)

भाऊसाहेब:- देवा , काय हे? (रेवती गळा काढून रडायला लागते)

जगदीश:- (चैतन्यचा हात धरून त्याला समोर आणतो ) हा चालेल?

मकरंद:- हा ...? ही तर ...

चैतन्य:- एक मिनिट हं ... (आत जातो)

भाऊसाहेब:- जगदीश, काय प्रकार आहे हा सगळा?

रेवती:- जगदीश ...

जगदीश:- थांबा . थोडे थांबा . सगळे सांगतो . रेवती, मला माफ कर .

रेवती:- अरे, एखादी मुलगी चक्क तुझ्या रुमवर येते आणि तरी मी गप्प बसू?

जगदीश:- आणि ती मुलगीच नसेल तर?

भाऊसाहेब:- म्हणजे? काय बोलतोस? डोके ठिकाणावर आहे ना? माझे तर आता डोकेच फिरायची वेळ आली आहे . काही नको इथे रहायला . मला वाटले होते त्या कार्ट्याबद्दल तुला नक्कीच माहित असेल, तो कुठे आहे, काय करतोय ते . म्हणजे खात्रीच होती मला . म्हणून निर्धास्त होतो मी . पण तू तर इथे

तिसऱ्याच भानगडी करून ठेवल्यास . कोण ती मुलगी , चक्क तिला घेवून आलास रुमवर . तो तसा अन तू असा .

जगदीश:- भाऊसाहेब , नाही ओळखले ना तुम्ही सुध्दा ? तुमच्या स्वतःच्या मुलाला ? (तेवढ्यात चैतन्य आतून मुलाच्या वेशात येतो .)

चैतन्य:- भाऊ , माफ करा मला .

भाऊसाहेब:- तू? म्हणजे तू ? आत्ता इथे …

रेवती:- अगबाई , ….

चैतन्य:- भाऊ …

मकरंद:- काय प्रकार आहे हा सगळा ?

जगदीश:- मी सांगतो सगळे . (मकरंदकडे बघून) हा माझा मित्र , चैतन्य राजे, वडगावकर . यांचा मुलगा .

मकरंद:- म्हणजे आत्ता हेच इथे मुलीच्या वेशात होते का?

चैतन्य:- हो . मीच . मी घरी कुणाला न सांगता इथे आलो . भाऊ, प्लीज . ऐकून घ्या न … नाटकात काम करायची कितीही आवड असली तरी मी नोकरीच्या शोधात होतोच . पेपरमधल्या जाहिराती बघत होतो . पण एकही नोकरी मला पसंद पडत नव्हती .

जगदीश:- आणि मग मी एक सेल्स गर्लची जाहिरात बघितली . मी चैत्याची थोडी मस्करी केली . म्हटले , तू मुलीचा ड्रेस घालून सेल्स गर्लच्या इंटरव्ह्यूला जा.

रेवती:- पण मुलीचे कपडे?

जगदीश:- तुझ्यासाठी मी काही ड्रेस घेतले होते . आत्ता त्याने घातला होता तो ड्रेस तुझ्यासाठीच आणलेला होता …

मकरंद:- इंटरेस्टिंग . मग?

जगदीश:- मग काय? खरे तर तो नाही म्हणत होता .

चैतन्य:- पण ह्याने माझ्याशी पैज लावली . आणि पैज लावल्यावर कुणी माघार थोडीच घेणार ? भाऊ, मी माघार घेतली असती तर तुम्हाला आवडले

असते ?

भाऊसाहेब:- नाहीतरी ती हौसच आहे तुम्हाला …

रेवती:- काय लावली पैज?

चैतन्य:- मस्तपैकी पार्टी देणार आहे तो . एका मोठ्या अलिशान हॉटेलमध्ये . तुम्हाला पण यावे लागेल बरे का वहिनी ?

जगदीश:- ते बघू रे . तर चिटणीस सर, असे आहे हे सगळे . चैत्याला खूप आवड आहे नाटकाची . कॉलेजमधे असतांना त्याने बरीच कामे केली आहेत नाटकातून . महाराष्ट्र राज्य नाट्य स्पर्धा, शिवाय वेगवेगळया एकांकिका स्पर्धा . बक्षिसे पण मिळाली आहेत त्याला .

मकरंद:- fantastik . ग्रेट . अहो, त्याच्या वडिलांनी पण त्याला ओळखले नाही म्हणजे? कमाल आहे .

भाऊसाहेब:- हो . नाही . म्हणजे तसा गुणाचा आहे तो . पण मला एक सांगा , कोण देणार याला नाटकात काम?

मकरंद:- मी देईन . दिले …. माझ्या नवीन नाटकात मी तुला काम दिले .

चैतन्य:- काय खरंच ?

मकरंद:- हो … खरंच . ही जागा ताब्यात आली की रिहर्सल सुरु .

जगदीश:- जागा तुमच्याच ताब्यात आहे असे समजा …

भाऊसाहेब:- आणि फोडा नारळ .

रेवती:- एक मिनिट हं … आलेच . (पर्स घेवून आत जाते .)

भाऊसाहेब:- देवा, परमेश्वरा, तुझी लीला अगाध आहे . खरेच . या पोराची एवढी जबरदस्त इच्छा होती, नाटकात काम करायचा एवढा ध्यास घेतला होता त्याने की बस . त्याचे म्हणणे ऐकलेस रे बाबा तू …

मकरंद:- त्याची आता तुम्ही काळजीच करू नका भाऊसाहेब . त्याच्यातला स्पार्क बघितलाय मी . आता नाही मागे जाणार तो . तो आता आमचा झालाय .

चैतन्य:- हुर्रे sss (जोरात ओरडतो आणि जगदीशला पुन्हा एकदा मिठी मारतो)

जगदीश:- अरे अरे.... बघ , मी तुला म्हणालो होतो ना , आज तुझ्या भविष्यात लिहिलेलेच होते संधी चालून येईल म्हणून .

(तेवढ्यात रेवती येते . एका डिशमध्ये स्वीट घेवून येते)

चैतन्य:- आता तरी काही हरकत नाही ना वाहिनी तुमची?

रेवती:- इश्य ssss . अभिनंदन हं चैताली .

भाऊसाहेब:- चैताली उर्फ नानू .

मकरंद:- आता हा नानू कोण आणखी?

जगदीश:- नानू उर्फ चैतन्य .... उर्फ ....

चैतन्य:- पुरे ... पुरे . Thanks . आणि आता तुम्ही दोघे आरामात खरेदीला जावून या .

जगदीश:- हो, चल जायचं का आता? झाला ना आता तरी गैरसमज दूर? आता अगदी उजळ माथ्याने सांगतो, भाऊसाहेब, मकरंद चिटणीस , ही माझी होणारी पत्नी . रेवती .

रेवती:- (दोन्ही हात जोडून नमस्ते करते)

मकरंद :- अभिनंदन तुम्हा दोघांचे आणि धन्यवाद . जागेबद्दल .

जगदीश:- अहो धन्यवाद कसले मानता. ते तर आम्ही तुमचे मानायला पाहिजेत .

मकरंद:- बरं चला, मी निघतो आता . उशीर होतोय . आणि चैतन्य, हे माझे कार्ड . केव्हाही फोन कर . चल, येतो .

(मकरंद चिटणीस निघून जातात .)

चैतन्य:- हं ... चला निघा आता . मी पण येतो तिथपर्यंत .

भाऊसाहेब:- तू कुठे निघालास? आपण दोघेही निघू आता गावाकडे . तुझी आई वाट बघत असेल.

चैतन्य:- नाही, आज नको . तुम्ही रहा आता आजच्या दिवस इथेच . आराम करा . सकाळी जावू आपण . मी आईला फोन करून सांगतो सगळे व्यवस्थित . आणि हो, येताना तुमच्यासाठी डोसा घेवून येतो , तुमचं ते पार्सल का फिर्सल.

(सगळेजण निघून जातात . भाऊसाहेब आनंदाने डोळयातले अश्रू पुसतात . )

भाऊसाहेब:- तो तसा अन हा असा ! वेडे कुठले !....

**(पडदा पडतो . समाप्त )**

**************************

# नंदिनी देशमुख

नंदिनी देशमुख यांना लहानपणापासूनच लेखनाची आणि वाचनाची आवड होती.
१९७७-७८ पासून त्यांनी लेखनास प्रारंभ केला. गेल्या पस्तीस वर्षांत अनेक मासिकांमधून त्यांच्या कथा प्रसिद्ध झाल्या आहेत. औरंगाबाद आकाशवाणी केंद्रावरून त्यांचे नभोनाट्य आणि ऐतिहासिक लेखन प्रसारित करण्यात आले. कथाश्री , आवाज, स्नेहप्रभा इ. दिवाळी अंकामधून त्यांच्या कथा प्रसिद्ध झाल्या. सकाळ कथा विशेषांक २००९ मध्ये त्यांच्या 'प्रमोशन' या कथेला प्रथम पारितोषक मिळाले. लोकसत्ता, सकाळ मधून त्यांनी विविध प्रकारचे लेखन केले. दैनिक प्रजावाणी नांदेड, दैनिक उद्याचा मराठवाडा, नांदेड या वर्तमानपत्रामधून त्यांनी सदर लेखन केले.
महाराष्ट्र राज्य नाट्य परिषद नांदेड शाखेतर्फे 'अनुवंश' आणि 'मी रचना देसाई' या त्यांच्या नाटकांचे प्रयोग करण्यात आले. कामगार कल्याण मंडळ स्पर्धेत 'तुमच्यासारख्या तुम्हीच' या त्यांनी लिहीलेल्या एकांकिकेला प्रथम पारितोषक मिळाले. २००४ मध्ये 'औट घटकेची राणी ' ही कादंबरी आणि २०१० मध्ये निरनिराळया मासिकांमधून प्रसिद्ध झालेल्या कथांचा 'कुंपणाच्या पलीकडे' हा कथा संग्रह प्रकाशित झाला.
हे सर्व लेखन करत असतानाच त्या नोकरीदेखिल करत होत्या. भारत संचार निगम लिमिटेड, मुंबई येथून लेखाधिकारी या पदावरून निवृत्त झाल्या.
ई साहित्य प्रतिष्ठानच्या वाचकांसाठी त्यांनी "हा छंद जिवाला..." ही एकांकिका विनामुल्य दिल्याबद्दल वाचकांच्या वतीने आम्ही त्यांचे आभार मानतो.

## टीम ई साहित्य

# ई साहित्य प्रतिष्ठान

ई साहित्य प्रतिष्ठान ही काही व्यावसायिक प्रकाशन संस्था नाही. काही सामाजिक ध्येय डोळयांसमोर ठेवून मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती यांच्यासाठी ही तरुणांची संस्था काम करते आहे. सध्या ई साहित्य प्रतिष्ठानचे सव्वा दोन लाख वाचक आहेत.

ई साहित्य प्रतिष्ठानच्या पुस्तक खजिन्यात सातत्याने नवनवीन भर पडत असते. २०१४ मध्ये सुमारे शंभर ई पुस्तके आम्ही प्रकानशित केली. नवीन खूप सारी पुस्तकं लवकरच येत आहेत. एकाहून एक भारी. ही सर्व पुस्तकं सर्वच्यासर्व सव्वा दोन लाख वाचकांना देण्याचा आटोकाट प्रयत्न केला जातो. पण प्रत्येक वेळी ते जमतेच असे नाही. अनेक वाचकांपर्यंत काही पुस्तके पोहोचत नाहीत. पण VIP सदस्यांना मात्र सर्व पुस्तके नक्की दिली जातात. तुम्हाला सर्वच्या सर्व पुस्तके हवी असतील तर VIP सभासद बना.

VIP सभासद बनणं अगदी सोप्पं आहे. आपल्या ओळखीच्या दहा लोकांचे मेल आय डी कळवा आणि बना VIP सभासद.

एका दमात तीन कामं.

1. पहिलं म्हणजे तुम्ही VIP सभासद बनता. तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानचं पुस्तक ई मेलवर सर्वात आधी मिळतं. त्यांच्या प्रत्येक कार्यक्रमाचं आमंत्रण मिळतं. त्यांच्या भावी योजनांची माहिती मिळते. त्यांच्या कामात स्वतः सहभागी होण्याची संधी मिळते.

2. ज्या दहा किंवा अधिक मित्रांना तुमच्यामुळे फ़्री पुस्तकं मिळतात ते खुश होतात. त्यांना त्यांच्या आवडीची पुस्तकं मिळाली की ते इतर लोकांना तुमच्याबद्दल सांगतात. त्यांच्यासाठी तुम्ही म्हणजेच ई साहित्यचे प्रतिनिधी बनता.

3. आणि यातून तुम्ही मराठी भाषेच्या संवर्धनाला अमूल्य असा हातभार लावता. आमचा उद्देश आहे मराठीतल्या सहा कोटी साक्षरांना वाचक बनवणं. आणि हे लक्ष्य साध्य करणं हे केवळ आणि केवळ मराठी लोकांना त्यांच्या भाषेवर असलेल्या प्रेमातूनच शक्य आहे. आपल्या भाषेचं राज्य व्हावं म्हणून १०६ हुतात्मे झाले. आपल्या भाषेनं राजा व्हावं म्हणून आपण एक दहा-वीस ई मेल आयडी देणारच ना! वाचनाची आवड असो वा नसो. फ़क्त मराठी साक्षर अशा दहा लोकांचे ई मेल पत्ते पाठवा. त्यांना वाचनाची आवड आपोआप लागेल. आपणच लावू. लावूच लावू. करूनच दाखवू.

आहे ना : एक दम : तीन काम.

संपर्क साधा : esahity@gmail.com

ही सेवा पूर्णपणे निःशुल्क आहे. त्यामुळे आपले मित्र आपल्यावर खुश होतील. शिवाय आम्ही ही खात्री देतो की या ई मेल्सचा वापर फ़क्त आणि फ़क्त मराठी साहित्य पाठवण्यासाठीच केला जाईल. इतर कसल्याही जाहिराती पाठवून त्यांना त्रास दिला जाणार नाही. तेव्हा लवकरात लवकर आपल्या माहितीतल्या दहा किंवा अधिक मराठी साक्षरांचे ई मेल पत्ते आम्हाला द्या.

www.esahity.com या वेबसाईटला भेट द्या.

आपल्या पत्राची वाट पहात आहोत.

धन्यवाद

आपले नम्र
टीम ई साहित्य प्रतिष्ठान